**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक,गट-ब या पदावरील अधिकाऱ्यांच्या सन २०२५ मधील प्रशासकीय बदल्यांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२५/प्र.क्र.९२/ई-११४०६८६/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ३० मे, २०२५.

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील खाली नमूद कनिष्ठ प्रशासन अधिकारी/अधिक्षक/प्रबंधक, गट-ब या संवर्गातील अधिका-यांची त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर प्रशासकीय कारणास्तव बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्याचे कार्यालय | बदली नंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. एस. के. ठोंबरे | विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण कार्यालय, छत्रपती संभाजीनगर | भारतीय प्रशासकीय सेवापुर्व प्रशिक्षण केंद्र, छत्रपती संभाजीनगर |
| २. | श्री. धैर्यशील दिलीप कारीदकर | विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण कार्यालय, कोल्हापूर | विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण कार्यालय, सोलापूर |
| ३. | श्री. गणेश रामदास वळवी | विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण कार्यालय, जळगाव | भारतीय प्रशासकीय सेवापुर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक |
| ४. | श्रीम. अजिता खंडेराव शिंदे | भारतीय प्रशासकीय सेवापुर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक | तेलंग स्मारक मुलींचे वसतिगृह, मुंबई |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

३. संबंधित कार्यालय प्रमुखांनी बदली झालेल्या अधिका-यांना बदलीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अधिका-यांनी सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयातून त्यांची बदली नंतरची पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे.

४. संबंधित कार्यालय प्रमुखांनी बदली झालेले अधिकारी संबंधित कार्यालयातून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. संबंधित कार्यालय प्रमुखांनी रुजू होण्यासाठी आलेल्या अधिका-यांना रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाकाळ ठरुन काम न करता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित कार्यालय प्रमुख यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच, कार्यमुक्त झाल्यापासून बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत सदर अधिका-यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.

५. बदली झालेल्या अधिका-यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार पदग्रहण अवधी शासनाच्या प्रचलित नियमानुसार अनुज्ञेय राहील.

६. बदली करण्यात आलेल्या अधिका-यांचे पुढील महिन्याचे (जून महिन्यातील) वेतन हे बदली झालेल्या कार्यालयातूनच आहरीत करण्यात येईल याची दक्षता संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी घ्यावी.

७. सदर बदली आदेशाबाबतचा कार्यपालन अहवाल संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी १५ दिवसांत शासनास सादर करावा.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५३०१५२६१५०२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANTKUMAR PANDHARINATH BAVISKAR

Digitally signed by HEMANTKUMAR PANDHARINATH BAVISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=71de9bdf8c28541d92a5cd36d722315bab7f006ec5420633722d42e0976d82a8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=284A4236AE7795D36DD2ECB5AC6CA70C333A3CF1B13F66828D224AE2026B37E9, cn=HEMANTKUMAR PANDHARINATH BAVISKAR
Date: 2025.05.30 15:27:18 +05'30'

**(हे. पं. बाविस्कर)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
३) सर्व प्राचार्य/ संचालक, शासकीय महाविद्यालये/संस्था.
४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१ व २, मुंबई व नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७) संबंधित अधिकारी (कार्यालय प्रमुखामार्फत)
८) निवड नस्ती.

**प्रत,**

१) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.